# शैलेश पुरोहित



# जीवनगौरव

## आणि इतर कथा

जीवनगौरव आणि इतर कथा

लेखक : शैलेश न. पुरोहित

मुंबई.

मोबाईल : ८४५२८०३६६३

ई मेल :

shainpu1208@gmail.com,

shain_p@rediffmail.com

या पुस्तकातील लेखनाचे सर्व हक्क लेखकाकडे सुरक्षित असून पुस्तकाचे किंवा त्यातील अंशाचे पुनर्मुद्रण वा नाट्य, चित्रपट किंवा इतर रुपांतर करण्यासाठी लेखकाची लेखी परवानगी घेणे आवश्यक आहे. तसे न केल्यास कायदेशीर कारवाई होऊ शकते.

माझा पहिला वहिला कथासंग्रह माझ्या

आई वडिलांना (अण्णांना) अर्पण करतो.

# मनोगत

नमस्कार,

२०१४ साली माझे पहिलेवहिले प्रवास वर्णनात्मक ई पुस्तक ‘इंद्रपुरी सिक्कीम’ प्रकाशित झाले, वाचकांचा छानच प्रतिसाद मिळाला. अभिप्रायाच्या अनेक ई मेल्स आल्या, फोन आले त्यामुळे असेल कदाचित, लिखाणाविषयी आत्मविश्वास वाढला तेव्हा वाटलं, एखादी कथा लिहावी असे वाटू लागले. ई साहित्यचा नियमित वाचक असल्याने कथा लेखनाची उर्मी स्वस्थ बसू देत नव्हती. वृत्तपत्रातील पत्र प्रपंचाचा  अनुभव होता, परंतु ‘कथा’! नाही जमणार असे म्हणत अनेकदा मी कथा लेखनाचा विचार झटकून टाकी, परंतु काही दिवसांनी पुन्हा तो डोके वर काढी. बरे, माझे आजवरचे वाचन हे तसं गंभीरतेकडे झुकणारे, आत्मचरित्र वगैरे, ह्याचा अर्थ ‘नाठाळा नावडे विनोद’ असे नाही बरे. हलकं फुलकं, विनोदी साहित्याकडेही माझा ओढा आहे. असो. तेव्हा लेखनाचा संकल्प सोडला. माझ्या लेखनात आपल्याला कदाचित जुन्या साहित्यात असतो तसा एखादा निवेदक कथा सांगताना, कथानक पुढे नेताना आढळेल परंतु जेथे आवश्यक आहे तेथे मी निवेदकाच्या भूमिकेत गेलेलो आहे / रमलेलो आहे.

अनेक दिवस मला विषय सुचत नव्हता. एका दुपारी बझार गेट स्ट्रीटवरून जाताना माझे जुने ऑफिस लागले, मी माझ्या आताच्या एका सहकाऱ्याशी बोलताना कळत नकळत त्या ऑफिसच्या आठवणी सांगू लागलो, आणि अचानक मला सुब्बूची आठवण

झाली, ‘सुब्बू’ आमच्या ऑफिसात स्टेनो टायपिस्ट अगदी निष्पाप व्यक्तिमत्व, मग मनात आलं समजा अशा व्यक्तीला चुकून ‘झेड’ सुरक्षा मिळाली तर? .... आणि दोन चार महिनाभरातच कथा गुंफली गेली.

नंतर एकाच वेळी दोन विषय सुचले ‘जीवनगौरव’ आणि ‘पांडे असोशिएटस’. त्याचे असे झाले एका संध्याकाळी रेल्वेने घरी जात असताना एक जोडपे समोर बसले होते, हातात फुलांचा गुच्छ, पिशवीत हार, पती भरभरून ऑफिसच्या आठवणी सांगत होता, मनात आलं अजून काही काळानी तो त्या ऑफिसात गेला तर? आणि तेथे ‘जीवनगौरव’ कथेचा जन्म झाला. अनेकदा राजकीय नेते, उद्योजकांची चौकशी सुरु झाली की ते आजारी पडतात ह्या वास्तवतेवर आधारित ‘पांडे असोशिएटस’ लिहावी असे वाटलं. एकाचवेळी दोन कथा सुचत गेल्या व तसे लिहिण्याचा एक वेगळाच अनुभव आला. ‘आगळा वेगळा प्रयोग... ’ व सुब्बू ह्या दोन कथा फॅन्टसीकडे झुकणाऱ्या आहेत. आपण सामान्यजन राजकारण्यांच्या किंबहुना सत्ताधाऱ्यांच्या काही अचाट कल्पनांची शिकार होतो, आपल्याला तो सगळाच प्रकार हास्यास्पद वाटतो परंतु आपण काही करू शकत नाही. ‘आगळा वेगळा प्रयोग’ ही अशीच काहीशी कथा आहे. ‘दांभिक’ मे महिन्याच्या शेवटी पूर्ण झाली. ही कथा काहीशी माणसाच्या बदलत्या मानसिकते विषयी भाष्य करणारी आहे. चाळीत जेवढी माणुसकी होती ती उच्चभ्रूंच्या सोसायट्यात अभावानीच दिसते. तेव्हा, या पाच कथांचा छोटेखानी संग्रह आपल्यापुढे ठेवताना मला खूप आनंद होत आहे. ई साहित्यने माझ्यासारख्या

नवोदिताचे ई पुस्तक प्रकाशित केल्याबद्दल मी श्री सुनील सामंत व त्यांच्या सहकाऱ्यांचे आभार मानतो. मी वाचकांच्या अभिप्राय, सूचनांचे स्वागतच करेन.


आपला

शैलेश न. पुरोहित

मुंबई.

मोबाईल : ८४५२८०३६६३

ई मेल : shainpu1208@gmail.com,

shain_p@rediffmail.com

# सुब्बू

वेंकटेश्वर सुब्रमण्यम, आमच्या ऑफिसातील एक पापभिरू व्यक्तिमत्व, आमच्या रिजनल मार्केटिंग मॅनेजरांचे स्टेनो कम सेक्रेटरी, साऱ्या ऑफिसात ‘ सुब्बू ’ म्हणून प्रसिध्द, वय ४५ ते ४७, वयाला साजेसे पातळ केस ते देखील शिवाजी गणेशन स्टाईल, काळया काड्यांचा चौकोनी फ्रेमचा चष्मा, उंचीला पाच फूट दोन - तीन इंच, काहीशी हाडकुळी शरीरयष्टी, वर्णाने अस्सल ‘सौदिनडीअन’. कपाळावर भस्मम( ऑफिसात आला की पुसून टाकायचा). जुन्या पद्धतीची प्लेट्स असणारी काळी पॅंट, व कडक इस्त्रीचा पांढरा शर्ट, ऑफिसात आला की ऑफिसात वापरायचा बुटांचा जोड पायात घालायचा व रुक्मिणीने (रुक्मिणी त्याची 'वैफ’ बरं का !) घरून दिलेले तीन डबे ( एक मॉर्निंग ब्रेकफास्ट, एक लंच आणि एक कोरड्या सायंकालीन नाश्त्याचा, समजा संध्याकाळी उशिरापर्यंत थांबावे लागल तर, म्हणून) व एका थर्मासमध्ये दिवसभर पुरेल इतकी ‘मद्रासी कापी’ आपल्या टेबलावर मांडून ठेवत असे. व्यक्तिमत्व एकदम ‘स्ट्रेटट फ़ॉरवर्ड’, काहीसे फटकळ, पण कुणाच्या ना अध्यात ना मध्यात.

असा हा सुब्बू रेल्वेने ‘फर्स्ट क्लासने’ यायचा व जायचा, एकदा गाडीत एका गुंडाला नडला, प्रकरण पार पोलीस स्टेशन पर्यंत गेले, सुब्बूच्या इंग्लिश पुढे पोलीसांनी नांगी टाकली आणि सुब्बूला सोडून दिले व तासाभराने गुंडाला सज्जड दम भरून सोडले.

दुसऱ्या दिवशी गुंडाने सुब्बूला गाठले व धमकावले आणि बोलता बोलता रिव्हॉल्वर खिशातून बाहेर काढले, झाले, सुब्बू जीवाला धोका म्हणून आठवडाभर रजेवर गेला.

सुब्बू पुन्हा आला तो सोबत दोन बंदुकधारी घेऊनच. आम्ही दचकलोच, सुब्बुने आपल्या हिंग्लिश कम मराठीत खुलासा केला, " वो क्या है, मेरा एक डिस्टंट रिलेटिव्ह 'रामलिंगम' पोलीस कमिशनर ऑफिसात स्टेनो आहे. मैने, गुंडाची गोष्ट त्याच्या कानावर घातली व रामलिंगमने त्याच्या साहेबाच्या. एके दिवशी सकाळी दारात स्टेनगन घेतलेले दोन उंचेपुरे पोलीस हजर. मै तो डरच गया, मग पोलीसाने मला पोलीस कमिशनर साहेबांनी सिक्युरिटी दिल्याचे सांगितले व सोबत आणलेली कागद्पत्रे दाखवली, 'जॉयनिंग रिपोर्ट' वर सही घेतली ".

अशा तऱ्हेने कोणाच्या ध्यानीमनी नसताना 'सुब्बूला झेड' दर्जाची आर्मड सिक्युरिटी मिळाली. पोलिसाने सुब्बूला ऑफिसला जाण्यायेण्याचा रस्ता विचारला व त्याप्रमाणे कंट्रोल रूमला तसे कळविले. सुमारे तासाभराने कंट्रोल रूमकडून क्लीअरंस मिळाला व सुब्बूला ऑफिसला जायची परवानगी मिळाली. आता कोठेही जायचे तरी पोलीस कंट्रोल रूमला कळवायचे, त्यांचा क्लीअरंस घ्यायचा व मगच घर सोडायचे, 'पोलिसाने असे बजावले', म्हणजे ह्यापुढे सुब्बूला रविवारी 'मणीज' कडे 'रस्सम वडा' व 'उलंडू डोसा', 'पायनापल शिरा' खायला जाता येणार नसल्याचे जाणवले.

एव्हाना सुब्बू राहत असलेल्या इमारतीच्या खिडक्या सुब्बूच्या शेजाऱ्यांनी व्यापून टाकल्या, साऱ्यांना सुब्बूच्या अचानक आलेल्या सिक्युरिटी विषयी औत्सुक्य होते. सुब्बू राहायला माटुंग्याला, नप्पू रोड वर, दोन शस्त्रधारींसह चालताना सुब्बूला कसेसेच वाटत होते. आमचा सुब्बू पाच फूट आणि त्याची सिक्युरिटी सहा - साडेसहा फूट उंच, तेव्हा एकत्र चालायचे म्हणजे तिघानाही कसरत करायला लागायची. मजेशीर दृश्य होते ते, कसेबसे ते 'माटुंगम' स्टेशनवर आले. सकाळच्या गर्दीत दोघांना सोबत घेऊन गाडीत चढण्याच्या प्रयत्नात सुब्बूने चार – पाच गाड्या सोडल्या. तेव्हा गाडी पकडण्याचा नाद सोडून सुब्बूने तडक टॅक्सी पकडली, मध्ये सुब्बू व दोन बाजूला दोन बंदुकधारी. टॅक्सी चालकाला काय झाले काही समजेना त्याला एवढा घाम फुटला व त्याने गाडी जोरात पळवायला सुरुवात केली. भायखळयाच्या सिग्नलला त्याने हळूच पाठीमागे न पाहता त्याच्या मानेला बंदुकीची नळी टोचत असल्याचे सांगितले, तेव्हा त्याच्या गाडी जोरात पळवण्याचे कारण समजले, ती बंदूक लॉक केली असल्याचे पोलिसाने त्याला सांगितले खरे, 'पर क्या है', त्याने खुलासा केला, 'ये सरकारी बंदूक है, कब चले क्या पता, बाल बच्चे वाला हू, डर तो लागता है ना '.

संध्याकाळी तो नियमीत कुर्ला लोकलने जात असल्याने फारसा त्रास झाला नाही. पण घरी पोहोचताच रात्रपाळीचे पोलीस हजर. आता त्यांची झोपण्याची काय व्यवस्था करायची ह्याचा सुब्बू विचार करू लागला. पावसाळा नसल्याने रात्रपाळीच्या पोलिसांनी व्हरांड्यातच पथारी पसरली व सुब्बूची मुक्तता केली. दुसऱ्या दिवशी देखील

सुब्बू कसाबसा गाडीत चढला. तिसऱ्या दिवशीतर रिव्हॉल्वर दाखवणाऱ्या गुंडाने सुब्बूला गाठून चक्क चहा ऑफर केला.

सुब्बूला झेड सिक्युरिटी मिळाल्याचे वर्तमान साऱ्या नातेवाईकांत पसरले व सुट्टीच्या दिवशी सुब्बुच्या घरी एक एक करून नात्या-गोत्याच्या माणसांची, सुब्बूच्या मुलाचे 'कार्तिक'चे मित्र यांची रीघ लागू लागली. समाजात, नातेवाईकांत, ऑफिसांत सुब्बूचा दर्जा वाढत होता. एरवी सुब्बूला टाळणारी माणसे सुब्बू सोबत प्रवास करण्याचा प्रयत्न करू लागली. परंतु सकाळी दोन - दोन गार्डसना घेऊन गाडी कशी पकडायची हा प्रश्न काही सुटत नव्हता, नंतर एके दिवशी अपंगांच्या डब्यातून जाण्याची सुब्बूला बुद्धी की दुर्बुद्धी झाली व तो अपंगांच्या डब्यात आपल्या सुरक्षादलासोबत माटुंग्याला चढला खरा पण दादरला स्पेशल स्क्वाडने तिघानाही उतरवले, झाले, अपंगांच्या डब्यातून उतरवताना आपल्याला ओळखीच्या कोणी पहिले तर नाही ना? ह्या शंकेने त्याला ग्रासले. ते एक टेन्शन तर टी सी, तू ह्या डब्यात चढलासच का? आता चल स्पेशल मॅजिस्ट्रेटकडे, असे बोलू लागले. अखेर हत्यारबंद पोलिसानेच सुब्बूच्या जीवाला किती धोका आहे व म्हणून त्याला सरकारने 'झेड' सिक्युरिटी दिली हे सांगत सुब्बूची व आपली सुटका करून घेतली व ऑफिस गाठले.

आठ ते दहा दिवस ऑफिसातल्या सहकाऱ्यांची सकाळ सुब्बूचे नवनवीन किस्से ऐकण्यात गेले. सुब्बू आमच्या ऑफिसचा एकदम हिरो झाला. हळूहळू सुब्बूला व ऑफिसला सुब्बूच्या सिक्युरिटीची सवय झाली व सुब्बूच्या भोवतालीचे कोंडाळे कमी होऊ लागले.

एकदा रुक्मिणीच्या भाचीचे ‘अरंगेत्रम’ षण्मुखानंद हॉलमध्ये होते. दिवसभराचा भरगच्च कार्यक्रम होता. कार्यक्रमाला तामिळनाडूचे सांस्कृतिक मंत्री येणार होते. सुब्बू सकाळीच दक्षिणात्य पारंपारिक वस्त्रे लेऊन रुक्मिणी व कार्तिकसह निघाले, आता माटुंग्याहून षण्मुखानंद फार अंतर नाही परंतु सुब्बूला दोन टॅक्सीज कराव्या लागल्या एकीत तो व त्याची सिक्युरिटी व दुसरीत रुक्मिणी व कार्तिक. योगायोगाने मंत्री महोदय व सुब्बू एकाच वेळी हॉलवर पोहोचले. मंत्री महोदायांपेक्षा सुब्बूनेच जास्त गर्दी खेचली. मंत्री महोदय देखील आपल्या चेहऱ्यावरील कौतुक मिश्रित आश्चर्य लपवू शकले नाही. सभागृहात सुब्बू, रुक्मिणी, कार्तिक पहिल्या रांगेत मंत्रीमहोदयांच्या शेजारी. जो तो सुब्बू सोबत आपला फोटो निघण्यासाठी धडपडत होता. सारे कसे छान चालले होते. सुब्बू कधी ‘झेड सिक्युरिटी एन्जॉय’ करीत होता, मध्येच त्याचा त्याला त्रास देखील होत होता, कधीतरी तिचा अतिरेक ही होताना पाहत होता तेव्हा तो कावल्या सारखा वाटत होता.

आणि अचानक त्याची सिक्युरिटी सोबत दिसेनाशी झाली व तो एकटाच ऑफिसला येऊ लागला. ऑफिसातल्या मंडळीची जिज्ञासा चाळवली, परंतु सुब्बूकडे सांगण्यासारखे काहीच नव्हते. एक दिवस सुब्बू ऑफिसात, पोलीस कमिशनरच्या कार्यालयाकडून आलेली नोटीस घेऊन आला, तिच्यात ‘तुमची सिक्युरिटी काढून घेत आहोत’, इतकेच लिहिलेले होते. इतर कोणताही खुलासा नव्हता. सुब्बूने रामलिंगमना फोन लावला व सारे सांगून चौकशी करायला सांगितले. आठवडाभरात रामलिंगमचा फोन आला,

तो व सुब्बू चांगले १५ – २० मिनिटे तामिळमध्ये बोलत होते. सारे ऑफिस - अगदी त्याच्या लिलाववाला साहेबा सकट- सुब्बू भोवती जमा होऊन ऐकत होते. समजत काहीच नव्हते, पण सुब्बूच्या चेहेऱ्यावरील भावावरून कोठेतरी - काहीतरी घोळ झाला असल्याचे जाणवत होते.

त्याचे असे झाले, सुब्बूने फोनवर झालेल्या संभाषणाचा वृत्तांत सांगायला सुरुवात केली. “ रामलिंगम जेव्हा त्यांच्या साहेबाला सुब्बूची कथा सांगत होते तेव्हा साहेबाने दोन तीनदा सुब्बूचे पूर्ण नाव विचारून देखील न समजल्याने रामलिंगमनी ते एका कागदावर पेन्सिलने लिहून दिले, अचानक साहेबाना दुसरा फोन आला, फोनवर बोलता बोलता साहेबांनी कागदावरील नाव वाचले, पुढे फोनवरील माणसाला त्यांनी अड्रेस? असे विचारले ते साहेबांच्या नजरेला नजर न मिळवणाऱ्या रामलिंगमना साहेब सुब्बूचा पत्ता विचारताहेत असे वाटले व त्याने सुब्बूच्या नावा खाली पत्ता लिहिला. हे सारे चालू असताना साहेबाना मंत्रालयातून गृहमंत्र्यांचे बोलावणे आले तेव्हा सारे कागद टेबलवर टाकून साहेबांनी तडक मंत्रालय गाठले. तिकडे गेल्यावर लक्षात आले मंत्रीसाहेबाना द्यायची यादी पोलीस मुख्यालयातच राहिली. त्यांनी आपल्या पी ए ला फोन करून ती यादी आपल्या टेबलवर असल्याचे सांगितले व ती नीट असल्यास तिची पी डी एफ फाईल बनवून गृहमंत्रालयात इ मेल वर पाठविण्यास सांगितले. त्याने, त्या यादीतील शेवटचे नाव हाताने लिहिलेले असल्याने संपूर्ण यादी पुन्हा टाईप केली व तिची पी डी एफ फाईल बनवून मंत्रालयात पाठवली. थोडक्यात, रामलिंगमने ज्या कागदावर सुब्बूचे नाव व पत्ता लिहिला ती ‘झेड’ सुरक्ष्या ज्यांना द्यायची, त्या मंडळींची यादी होती व सुब्बूचे नाव त्या यादीत

अजाणतेपणे गेले होते. गृहमंत्रालयाने सुद्धा, पोलीस आयुक्तांकडून आलेली यादी आहे, म्हणजे सारे सोपस्कार पूर्ण करून आलेली असणार हे गृहीत धरून त्या यादीवर चर्चा केली नाही”. अशा तऱ्हेने सुब्बुला झेड सुरक्षा मिळाली. तसे पहिले तर चूक कुणाचीच नव्हती तेव्हा दोष कुणाला देणार? दोन तीन महिन्यातच सारा खेळ संपल्याने सुब्बू देखील दु:खात वगैरे बुडाला नाही आणि सुब्बू आपल्या ‘रुटीन वर्क’ मध्ये मात्र लवकरच बुडून गेला.

१९. १२. २०१४

# पांडे असोशिएटस्

संध्याकाळची सहाची वेळ, श्रीपतराव ज्ञानमोठे, (महसूल मंत्री) मंत्रालयातील आपल्या अँटी चेंबरमध्ये बसले होते, बाहेर त्यांना भेटायला जमलेल्या समुदायातील एक एकाची सेक्रेटरी बोळवण करीत होते, इतक्यात त्यांना बातमी समजली की, पांडे असोसिएटचे सर्वे-सर्वा भुजंगराव पांडे यांना 'ब्रेन हॅमरेज'झाला व त्यांना 'गोब्राम्हण प्रतिपालक हॉस्पिटलच्या' आय सी यू मध्ये दाखल केलेले आहे. श्रीपतराव तडक निघाले व ३५ ते ४० मिनिटात हॉस्पिटलात पोहोचले.

श्रीपतराव स्पेशल आय सी यु च्या मोठ्या काचेतून गलितगात्र अवस्थेत व्हेन्टीलेटरवर असलेल्या भुजंगरावाना पहात होते, त्यांच्या बेडजवळ उभं राहून एक डॉक्टर व एक सिस्टर सतत कसल्यातरी नोंदी टिपून ठेवत होते. भुजंगरावांच्या चेहऱ्यावरील एक प्रकारचा विजयी भाव ते गेली कित्येक वर्षे पाहत आलेले होते तो कोठ्ल्याकोठे लोपला होता. त्यांचा विश्वासच बसेना की आपण पाहतो आहोत तो हाच आपला जिवलग मित्र आहे.

इतक्यात हॉस्पिटलचे डीन डॉ. बुलचन्दानी तेथे आले, मंत्रीसाहेबांना त्यांनी थोडक्यात काय झाले ते सांगितले. डॉ. त्यांना ब्रीफ करीत असतांनाच इ. डी.

(enforcement directorate) चे दोन अधिकारी तेथे आले, त्यांना तेथे पाहताच मंत्रीमहोदय हबकलेच. एकंदरीत परिस्थितीचे गांभीर्य ओळखून त्यांनी डीन साहेबांना दर तासाला रिपोर्ट द्यायला सांगितले. पुढच्या सारा कार्यक्रम रद्द करून श्रीपतराव बंगल्यावर काहीसे खिन्न मनाने परतले व कोणाशीही काहीही न बोलता एकटेच आपल्या बेडरूम मध्ये जाऊन बसले.

साधारण १९६० – ६२ साली भुजंगरावांनी नुकतच पांडे आणि कंपनी स्थापन करून सरकारची छोटी छोटी कामे करण्यास सुरुवात केली होती व श्रीपत ज्ञानमोठे, त्या काळी वरणगावच्या तहसील ऑफिसांत लोअर डिव्हिजन क्लार्क होता. त्याचे असे झाले, वरणगावच्या गावदेवी मंदिरावरून जाणाऱ्या रस्त्यावरचे खड्डे बुजवण्याचे कंत्राट पांडेला मिळाले. पांडेला मिळालेले ते पहिले वाहिलंच कॉन्ट्रॅक्ट, ऑर्डर कॉपी मिळवण्यासाठी पांडे तहसील ऑफिसांत नेहमी येत असे. त्याच्या एकंदरीत हावभावावरून श्रीपतीने हे नवखं पाखरू बरोबर हेरलं व एक दिवस बाहेर नेऊन सरकारी ऑफिसातील रिती-रिवाज समजावून सांगितले, पांडेने ही सारे लवकरच आत्मसात केले.

तहसीलदार कार्यालयातील कोणत्याही कर्मचाऱ्याचे काहीही खाजगी काम निघाल्यास पांडे ते विनातक्रार करीत असे, त्यामुळे तो ऑफिसातल्या साऱ्या मंडळीना आवडू लागला. हळू हळू पांडेला मोठी कामे मिळू लागली व पांडेचा जम बसू लागला. योगायोग कसा असतो पहा, पांडेला नुकतेच जिल्हा मुख्यालयाच्या जवळील रस्ता बनविण्याचे कंत्राट मिळाले होते व ग्रामविकास मंत्री दादा पाटील वरणगावांत पहिल्या

प्रथमच येणार होते, त्यांचा मुक्काम शासकीय विश्रामधामावर होता, रात्री तहसिलदारांतर्फे त्यांना स्पेशल खाना देण्यात येणार होता. एव्हाना तहसीलदार मलहोत्रांचा, भुजंग पांडेवर चांगलाच विश्वास बसला होता, तेव्हा, भोजनाची सारी जबाबदारी आपोआप पांडेवर आली व पांडेने ती लीलया पेलली. प्रत्यक्ष खान्याच्या दिवशी पांडे स्वतः सारीकडे लक्ष ठेऊन होता. तहसीलदारांनी पांडेची दादा पाटलांशी ओळख करून दिली. पुढे मुंबईच्या सचिवालयात पांडे वारंवार दिसू लागला.

डॉ. बुलचंदानींच्या फोनने मंत्रीसाहेब भानावर आले. “पांडेसाहेबांची प्रकृती स्टेबल करण्यात आम्हाला यश आले आहे, आता आमचं पुढचं लक्ष असेल, ते औषधांना कसे प्रतिसाद देतात ह्यावर लक्ष ठेवणे ”. त्यानंतर बराच वेळ श्रीपतराव गादीवर तळमळत होते परंतु झोप काही लागेना, अखेर, डॉ. फडकेंना फोन केला व त्यांच्या सल्ल्यानुसार सेडेटिव्हचा नेहमी पेक्षा जास्त डोस घेतला तेव्हा झोप लागली.

दुसऱ्या दिवशी साडेअकराच्या सुमारास मंत्रीमहोदय मंत्रालयात न जाता सरळ हॉस्पिटलमध्ये आले. एव्हाना भुजंगराव पांडेनी औषधांना प्रतिसाद द्यायला सुरुवात केली असल्याचे वर्तमान त्यांना समजले. अजूनही पांडेना कोणीही भेटू शकत नव्हते. श्रीपतरावांनी E. D. च्या अधिकाऱ्यांपाशी चाचपणी करण्याचा प्रयत्न केला, परंतु त्यांनी काही ताकास तूर लागू दिली नाही. काल रात्री पासूनच भुजंगरावांचे आर्थिक, कायदेशीर सल्लागार, त्यांचे सचिव, कंपनी सेक्रेटरी एक एक करून येऊ लागले. त्यांनी शेजारी असणाऱ्या एका हॉटेल मध्ये आपला तळ ठोकला व तेथेच त्यांच्या बैठकीच्या फेऱ्या झडू

लागल्या. साऱ्यांच्याच चेहेऱ्यावर एकप्रकारचा तणाव दिसत होता. वास्तविक पहाता मंत्रीमहोदय पांडे असोशिएट मध्ये घडणाऱ्या प्रत्येक घटनेचे साक्षीदार, परंतू कालपासून घडणाऱ्या बैठकींबाबत, त्यांत होणाऱ्या चर्चांबाबत ते अनभिज्ञ होते.

संध्याकाळी अस्वस्थ श्रीपतराव भुजंगरावांच्या बंगल्यावर गेले, तेथे भुजंग रावांचा मुलगा आशिष होता त्याची भेट घेतली. “आशिष, मी डॉक्टरांशी सविस्तर चर्चा केली, त्यांच्या म्हणण्या प्रमाणे, अशी काहीतरी ताणावात्मक परिस्थिती निर्माण झाली असावी व त्याचा परिणाम रक्तदाब प्रचंड प्रमाणात वाढण्यात झाला, परिस्थिती हाताबाहेर गेल्याने मेंदूत रक्तस्त्राव झाला. ”

“काका”, आशिष सांगू लागला, “ तुम्हाला माहित आहे की आम्हाला धरणाचे काम मिळाले, ते काम पूर्ण करण्याकरिता आम्ही राज्य सहकारी बँकेकडून १००० कोटींचे कर्ज काढले जे पुढील चार वर्षांत आम्हाला मिळणार होते, त्याचा २५० कोटींचा पहिला हप्ता आम्हाला मिळाला. पप्पांनी त्यातले २५ कोटी तुमच्या निवडणूक निधीला देण्याचे ठरवले होते. त्याच सुमारास बातमी आली, दिल्लीस्थित एच पी इन्फ्रास्ट्रक्चर आर्थिक बेशिस्तीमुळे दिवाळखोरीच्या उंबरठ्यावर उभी होती. दिल्लीच्या काही नेत्यांनी पप्पांमध्ये हवा भरली, मुंबईतील एका नेत्याने पप्पांना सावध राहण्याचा सल्ला दिला होती परंतु पप्पानी त्याकडे कानाडोळा करीत रातोरात एच पी इन्फ्रा चे साडेनऊ लाख शेअर्स विकत घेण्याचा निर्णय केला. त्यासाठी लागणारी १०० कोटींची रक्कम, बँकेकडून आलेल्या २५०

कोटीची फिरवाफिरवी करून उभी केली. हे पैसे एच पी इन्फ्रा ताब्यात आल्यावर त्यांच्या दिल्लीत मोक्याच्या ठिकाणी असणाऱ्या काही non performing assets विकून परत करायचे असा विचार होता व त्याला दिल्लीतील ‘मान्यवरांचा’ अलिखित पाठींबा होता.

परंतू एवढे समभाग एकदम पांडे असोशिएटच्या नावावर करायला एच पी इन्फ्राच्या बोर्डाने नकार दिला, व पुढे काही बँकांनीही त्यांचीच री ओढली, कोर्टाने देखील ह्या शेअर ट्रान्स्फरला स्थगिती दिली व मामला गंभीर झाला. एकतर पांडे असोशिएटचे १०० कोटी अडकून पडलेले होते व एच पी इन्फ्राच्या समभागाचा भाव चांगलाच खाली आला होता. धरणाच्या कामाने देखील जोर पकडला देणीदारांची देणी थकत चालली, विश्वासातील बँकांनी पतपुरवठा करण्यास नकार दिला. अखेर धरणाचे काम बंद करावे लागले. धरणाचे काम बंद झाल्याने कर्जाचा पुढचा हप्ता देखील रोखून धरला. पांडे यांच्या बैठकीतील दिल्लीतील उच्च पदस्थ त्यांच्या पासून दूर राहू लागले. थोडक्यात आमची आर्थिक घसरगुंडी सुरु झाली, शेअरचा भाव घसरू लागला. त्याच वेळी मुंबईत कोणीतरी पांडे असोशिएटचे शेअर्स उचलायला सुरुवात केली. झाले, पप्पांचा रक्तदाब वाढू लागला, साध्या साध्या गोष्टीवरून ते चीडचीड करू लागले, प्रसंगी रागाने त्यांचा तोल जाउन ते समोरच्यावर हात देखील उचलत. ”

“तरी मी भुजंगला वेळो वेळी सावध करीत होतो, परंतु त्याचे विमान इतके हवेत  होते की तो काही ऐकण्याच्या मनस्थितीत नव्हता. ” श्रीपतराव बोलू लागले,

सरकारी अधिकारी व राजकारण्यांविषयी तो नेहमी म्हणत असे, “प्रत्येकाची किंमत त्याच्या कपाळावर लिहिलेली असते, तुम्हाला ती वाचता आली म्हणजे तुम्ही अर्धी लढाई जिंकली. ”

भुजंग पांडेना सुरुवातीच्या काळात श्रीपतरावांनी केलेली मदत पांडे विसरले नव्हते, जिल्हा परिषदेच्या निवडणुकांत सत्ताधारी पक्ष ओ बी सी परंतु नवीन चेहे्ऱ्याच्या शोधात होता. श्रीपती देखील सरकारी नोकरीला कंटाळला होता, पांडेने तत्कालीन वजनदार मंत्री दादा पाटलांकडे श्रीपतराव ज्ञानमोठे याचं नांव सुचवले थोड्याश्या चर्चेनंतर ते संमत झाले, अशी श्रीपतरावांची राजकीय कारकीर्द सुरु झाली. कळत नकळत ते दादा पाटलांच्या गटांत सामील झाले. सभेला गर्दी जमवण्यापासून विरोधकांची सभा उधळण्या पर्यंत श्रेष्ठी सांगतील ती कामे श्रीपतराव करीत असे.

श्रीपतरावांकडे जसजशी नवनवीन कामे येऊ लागली / नवनवीन जबाबदा्ऱ्या पडत गेल्या, तसतशी दोघांतील वीण घट्ट होऊ लागली. एकमेकांना सहाय्य करीत दोघांचीही आपापल्या क्षेत्रात वाटचाल सुरु झाली. पुढे, श्रीपतराव राज्यात मंत्री झाले तर, ‘पांडे असोशिएट’ राज्यातील एक विश्वासार्ह समूह म्हणून उदयास आला. श्रीपतराव पक्षात दादा पाटलांचे विश्वसनीय असे सहकारी म्हणून समजले जाऊ लागले. अचानक एक दिवस बातमी आली की दादा पाटलांचे हॅलीकॉप्टर येवल्याजवळ भरकटले, वैमानिकाने आपला सारा अनुभव, शक्ती पणाला लावत हॅलीकॉप्टर एका शेतात उतरवले, त्यात त्याचा पंखा झाडाच्या फांद्यात अडकून झालेल्या अपघातात पाटील गंभीररीत्या जखमी झाले व श्रीपतरावांनी वेळ न दवडता आपले दिल्लीतील वजन वापरून आपले स्थान पक्के केले.

दादा पाटील जाताच त्यांनी जिल्ह्यात आपली मांड पक्की केली. हळूहळू 'श्रीपतराव' हा जिल्ह्याच्या राजकारणात परवलीचा शब्द बनला. श्रीपतरावांचा जसजसा विकास होऊ लागला तसतसा पांडे असोशिएट सुद्धा विकासाची एकएक पायरी ओलांडू लागली. पांडे असोशिएटचा दरारा एवढा वाढला की पांडे असोशिएट जेथे टेंडर भरीत असे तेथे त्यांचे प्रतिस्पर्धी निविदा भरीत नसत, कारण निकाल काय लागणार हे साऱ्यांना माहित होते. त्यामुळे भुजंगरावांना गगन ठेंगणे वाटू लागले. केव्हा केव्हा तर असे वाटत असे की, सरकारी कंत्राट म्हणजे पांडे असोशिएटलाच. साहजिकच, त्यांच्या विरोधात असंतोष वाढू लागला. परंतु भुजंगराव आपल्याच मस्तीत होते.

एव्हाना इंफोर्समेंट डायरेक्टरेट च्या मंडळीनी पांडे असोशिएटची कुंडली अभ्यासायला सुरुवात केली. त्याचबरोबर ई. डी. ची दुसरी टीमने असोशिएटच्या उर्ध्वयुंची एक एक करून कसून चौकशी सुरु केली. श्रीपतरावांनी त्यात अडथळा आणण्याचा प्रयत्न केला, परंतु ई. डी. च्या टीमने पांडे असोशिएटसने अवैध रीतीने संपत्ती देशाबाहेर नेलेली असल्याची खात्रीशीर माहिती आमच्याकडे आहे व ई डी टीमला  दिल्लीस्थित एका बड्या असामीचा आशीर्वाद आहे हे लक्षांत येताच श्रीपतराव बाजूला झाले, परंतु त्यांच्यातील मित्रत्वाचे नाते त्यांना गप्प बसू देत नव्हते.

"टिकूजी, मै श्रीपत मुंबईसे बोल रहा हू ", श्रीपतरावांनी दिल्लीला थेट गृहराज्य मंत्र्यांनाच फोन लावला. "पांडे असोशिएट के भुजंगराव की तबियत बोहोत ही क्रिटीकल है, और ई डी के अधिकारी कुच भी सुनने को तैय्यार नही है, जरा आप इसमे

कूछ... ” श्रीपतरावांचे वाक्य अर्धवट तोडत टिकू ठाकूर ताडकन उत्तरले. “देखो पांडेजी ने अपनी कबर खुद खोददी है, आजके सिचुएशनमे हम कुछ नही कर सकते”.

इकडे आशिष पांडे ह्याला पांडे असोशिएटच्या बोर्डाने, केंद्र सरकारला शरण जाण्याचा सल्ला दिला तसेच सदर प्रकरणी सक्तवसुली संचालनालयाला संपूर्ण सहकार्य करण्याचे पत्र घेऊन एक खास दूत दिल्लीला रवाना झाला.

भुजंगरावांची तब्येत हळूहळू सुधारू लागली. दोन महिन्यात क्रिकेटचा हंगाम सुरु झाला व क्रिकेटविषयक मजकुरानी वृत्तपत्रांचे स्तंभ काबीज केले. काळाच्या ओघात सारे कसे शांत झाले.

३०. ०९. २०१५

# दांभिक

आज सकाळपासून जशी चाबुकस्वारांच्या घरात धावपळ होती, तशीच त्यांचे शेजारी खोसला, सभरवाल, चक्रवर्तींच्या घरात देखील खूप हलचल दिसत होती. कारण, आज वरुण व वर्षा चाबुकस्वार दाम्पत्याचे दुसरे अपत्य ‘ऋषी’ ह्याचा पहिला वाढदिवस होता. तसा ऋषी, चंडीगड नजीकच्या पंचकुलातील ‘सिमरन रेसिडेन्सी’त प्रसिद्धच होता.

त्याचे असे झाले, वरुण चाबुकस्वार मुळचा पुण्याचा, मुंबई आय आय टी मधून त्याने एम टेक केले, कँपस इंटरव्ह्यूत सिलेक्ट झाला व मुंबईतल्या एका आंतरराष्ट्रीय औषधं बनवणाऱ्या कंपनीत (व्ही सी फार्मा) इरेक्शन विभागात ‘मॅनेजमेंट ट्रेनी’ म्हणून लागला. त्याची हुशारी, कामाचा उरक पाहून लवकरच तो ‘ग्रुप लीडर’ बनला. पुढे तो सिनिअर मॅनेजर झाला. मधल्या काळात त्याला तळोजा साईटवरून विविध प्रकारची बिले पास करून घेण्यासाठी अकौंटस विभागात एक्झिक्युटिव असणाऱ्या वर्षा देशमानेकडे वारंवार यावे लागे, ओळखीच रुपांतर मैत्रीत व मैत्रीचे रुपांतर प्रेमात कधी झाले हे दोघानाही समजलं नाही. दोन्हीही घराणी सुशिक्षित असल्याने घरचा विरोध असण्याचा प्रश्नच नव्हता. त्यांचे लग्न झाले, त्यानंतर वर्ष - दीड वर्षात वेदांगी झाली आणि वर्षाने नोकरी सोडली.

ती दोन वर्षाची असताना एका सकाळी अचानक एच आर विभागातून वरुणला बोलावण्यात आले, “वेलकम, यंग मॅन”, एच आर च्या जी एम, पालेकरांनी वरुणचे स्वागत करीत म्हटले, “कसा चालला आहे, प्रोजेक्ट? ” “संपत आलेला आहे, ” वरुणने उत्तर दिले, थोड्या इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्यावे पालेकरांनी सरळ मुद्द्यालाच हात घातला. “वरुण, तुम्ही उत्तम कामगिरी केलेली आहे, मॅनेजमेंट तुमच्या कार्यपद्धतीवर भलतीच ‘इम्प्रेस’ झाली आहे, आपल्या कंपनीने हिमाचल प्रदेशात बद्दी येथे आपला विस्तार करण्याचे ठरवले आणि तेथे श्री. एस पी ब्रार यांचा सहाय्यक म्हणून तुमची निवड केली आहे ”. दोन महिन्यात सहाय्यक जनरल मॅनेजर ह्या पदावर हिमाचल प्रदेशात बद्दी येथे रुजू व्हावे लागेल.

“सर, मला विचार करायला थोडा वेळ मिळेल? ”

“का नाही”, पालेकर म्हणाले, “ किती दिवस हवेत”?

घरी आल्यावर त्याने सर्वप्रथम वर्षाला ही बातमी सांगितली, तिने लगेच होकार दिला. मग त्याने आई बाबांशी बोलणे केले. व नंतरच ऑफिसात होकार कळवला मग एच आर कडून त्याला तिथल्या कामाचं स्वरूप, विविध भत्ते तसेच नवीन CTC काय असेल ह्याची कल्पना देण्यात आली. बद्दी हे अगदीच छोटे गाव होते, एस पी ब्रार आधीच पंचकुलात रहायला गेले होते, तेव्हा चंडीगड, पंचकुला किंवा पिंजौर – कालका येथे जागा

पहावी असे त्यांनी सुचवले. त्यांच्याच मध्यस्थीने  सिमरन रेसिडेन्सीच्या ‘बी’ विंगमध्ये कर्नल नम्बुद्रींच्या जागेत वरुण, वर्षा व वेदांगी रहायला आले.

अनोळखी शहर, अनोळखी शेजार म्हणून सुरुवातीला वरुण व वर्षाचे आई - बाबा आलटून पालटून राहायला आले. वरुणला शोफरसह गाडी देण्यात आली, तो सकाळीच साईटवर जात असे. हळूहळू शेजारपाजारच्या ओळखी होऊ लागल्या, संध्याकाळी वर्षा छोट्या वेदांगीला घेऊन सोसायटीच्या गार्डनमध्ये जाऊ लागली तिथे वेदांगीचा मित्र परिवार वाढू लागला. शेजारील खोसला व सभरवाल ह्यांची मुलं मोहिंदर व सुखविंदर, वरुणपेक्षा दोन – चार वर्षांनी मोठे असल्याने यांची वरुणशी चांगली दोस्ती जमली व ते कुटुंबाचा एक भाग असल्या प्रमाणे वागू लागले. तीनही परिवारातील जवळीक एवढी वाढली की, करवा चौथ च्या दिवशी वर्षा- वरुण देखील इतरांसोबत गच्चीवर जाऊ लागली.

पुढे वर्षाला दिवस गेल्याचे लक्षात आले आणि तीनही शेजाऱ्यांनी वर्षावर प्रेमाचा वर्षाव करण्यास सुरुवात केली. त्यांनीच चंडीगडच्या पी जी चंडीगड हॉस्पिटलमध्ये तिचं नाव नोंदवले. डिसेंबरच्या पहिल्या आठवड्यात वरुणची आई बाळंतपणा करिता पंचकुलाला आली आणि सारी तयारी पाहून सर्दच झाली. २५ डिसेंबरला वर्षाला मुलगा झाला बाळाच्या नावाची शोधाशोध सुरु झाली तो शेजाऱ्यांनी बाळाचे नाव ‘ऋषी’च ठेवायचे असे जाहीर केले. चाबुकस्वार – देशमाने मंडळीना नाही म्हटले तरी जरा वेगळेच वाटले परंतु पंजाबी आग्रहापुढे त्यांना मान तुकवावीच लागली.

ऋषीचा पहिलाच वाढदिवस असल्यामुळे मुंबईहून त्याचे दोन्हीही आजी – आजोबा, काका, मावशी वगैरे १० – १५ जण आले होते, त्यांची सोय 'सेव्हन सिझन्स' हॉटेलात केली होती, वास्तविक पाहता वाढदिवस सोसायटीच्या क्लब हाउसमध्ये होता. परंतु सारी मंडळी सकाळीच वरुणच्या घरी अवतरली व संपूर्ण मजल्यावर एकच धांदल उडाली. वरुणचे सहकारी, त्यांचे कुटुंबीय वगैरे बरीच मंडळी जमली होती. ऋषीचा जन्म दुपारी साडे बाराचा, तेव्हा ठीक साडेबारा वाजता केक कापला, मोठा जल्लोष केला साऱ्यांनी मिळून. आजुबाजूच्या मंडळीनी भेटींचा वर्षाव केला. वरुण – वर्षाच्या नातेवाईकांशी अगदी अनेक वर्षाची दोस्ती असल्या सारखे सारे वागत होते. आपल्या मुलांना उत्तम शेजार मिळाल्याने सारे सुखावले होते. पंजाबी गाणी काय, नाच काय, नुसता उत आला होता उपस्थितांना.

सुमारे चार वाजेपर्यंत पार्टी चालली होती. संध्याकाळी थकली-भागली मंडळी आपापल्या घरी, हॉटेलवर गेली. पुढे एक जानेवारी पर्यंत मुंबईकरांनी चंडीगड, मोहाली, पंचकुला, भाकरा- नांगल, आनंदपूर साहिब इत्यादी परिसर पाहून तृप्तीची ढेकर देत मुंबईकडे प्रस्थान केले. ३१ डिसेंबरला रात्री नववर्षाचे स्वागत साऱ्या सोसायटीने मोठ्या धुमधडाक्यात केले.

इकडे शेजाऱ्यांनी 'लोढी' जोरदार करण्याचा चंग बांधला. तीन जानेवारीला संध्याकाळी वरुण कामावरून परतला तो 'डोके दुखतंय' म्हणूत. अधून मधून त्याला डोकेदुखीचा त्रास होत असे त्या समजुतीने त्याने दोन सॅरिडॉनच्या गोळ्या घेतल्या आणि

बेडरूममध्ये झोपायला गेला. साडे नऊ – दहाच्या सुमारास थोडासा दुध भात खाल्ला. साडे बाराच्या सुमारास डोकेदुखी फारच वाढली व अस्वस्थ वाटू लागले. “वर्षा, मला काहीही सुचत नाहीये, डोके गरम झाल्यासारखं वाटतंय. ” असे म्हणत तो बाथरूम मध्ये गेला आणि डोक नळाखाली धरलं.

“वरुण तुझ डोक ठिकाणावर आहे काय” वर्षा कडाडली.

“नाही मला भयंकर अस्वथ वाटतंय”, एखाद्या लहान मुलासारखा रडता रडता तो त्याची व्यथा सांगत होता. पहाटे दीडचा सुमार होता, धावतच वर्षाने शेजारच्या खोसलांचा दरवाजा वाजवला आणि तिच्या लक्षात आले खोसला अंकल आणि आँटी त्यांच्या मुलीकडे गेलेली आहेत, हरकत नाही मोहिंदर व त्याची पत्नी पम्मी तर असेल, बराच वेळ बेल वाजवल्यावर मोहिंदरने दरवाजा उघडला पाहते तो इतका प्याला होता की त्याला उभं सुद्धा राहता येत नव्हते. पम्मी तर बाहेर सुद्धा आली नाही. तेव्हढ्यात सभरवालनी दरवाजा उघडला. वर्षाने थोडक्यात बेरात्री दरवाजा वाजवण्याचे कारण सांगितले, हार्ट पेशंट असणारे वयस्कर सभरवाल पुढे सरसावले व त्यानी मुलाच्या बेडरूमचा दरवाजा वाजवला, पण आतून कोणताही प्रतिसाद नाही. अखेर बेडरूमच्या दारावर जोरात आघात केला तेव्हा कोठे बेडरूमचा दरवाजा उघडला, आपल्या मुलाला व सुनेला विचित्र अवस्थेत पाहून व त्यांच्या चेहेऱ्यावरील भाव पाहून सिनिअर सभरवाल शरमले व त्यांनी बेडरूमचा दरवाजा बंद करीत म्हणाले, “बेटी मै तुम्हारे साथ अस्पताल आता हूं “, तिकडे चक्रवर्तीने दरवाजाच उघडला नाही.

अखेर आपल्यालाच आता पुढाकार घेतला पाहिजे असे मनाशी ठरवून वर्षाने मुलांजवळ सभरवाल दाम्पत्याला बसवले व ती वरुणला आधार देत लिफ्टने पार्किंग लॉट मध्ये आली, रात्रपाळीचे रखवालदार शेकोटी सोडून धावत आले. प्रसंगाचे गांभीर्य ओळखून त्यापैकी दोघे वर्षा सोबत जवळच्या हॉस्पिटल मध्ये जाण्यासाठी आले. वर्षा गाडी चालवत होती, शेजारी वरूण बसला होता हळूहळू त्याचे ओरडणे कमी झाले, हळूच त्याने तिच्या मांडीवर डोके टेकले व डोळे मिटले. वरूण आता शांत झाला होता. आता बरे वाटू लागले असावे ह्या भावनेने तिने गाडीचा वेग कमी केला.

हॉस्पिटलमध्ये पोहोचताच वरुणला झोप लागलेली आहे म्हणून सोबत आलेल्या सिक्युरिटी गार्डला पाठवून तिने डॉक्टरला पोर्चमध्ये या म्हणून गळ घातली.

“ नही, पेशंट को स्ट्रेचरपर लाईये तभी मै उनको देख पाउंगा, ” डॉक्टरही आपला हट्ट सोडेना, हे सारे साधारण अर्धातास चालले होते. अखेर एक R M O डोळे चोळत हॉस्पिटलच्या पोर्चमध्ये गाडी जवळ आला, त्याने वरुणची अवस्था पहिली आणि त्याला स्ट्रेचरवर घेण्याचा हट्ट सोडला, त्याने वरुणला तशा अवस्थेतच तपासले व तो धावतच आत जाऊन सिनिअर डॉक्टरना घेऊन आला. सिनिअर डॉक्टरांनी वरुणला तपासल्यावर, “बहनजी, हम सरजी को दाखील नही कर सकते, अगर दाखील करेंगे तो आपको और हमें भी बोहोत तकलीफ होगी”, असे म्हणताच वर्षाच्या पायाखालची जमीनच सरकली.

पण क्षणभरच, अचानक आलेल्या संकटाने तिच्या साऱ्या संवेदना जणू काही गोठून गेल्या आणि तशा अवस्थेत ती वरुणला पुन्हा सोसायटीत घेऊन आली. सिक्युरिटी गार्डच्या सहाय्याने वरुणला घरात आणले, पहाटेचे पावणेतीन वाजले होते, आजूबाजूला शांतता होती, वेदांगी आतमध्ये शांतपणे झोपलेली होती परंतु ऋषी जागा झाला, त्याला देखील काय समजले कुणास ठाऊक पण काहीतरी अघटीत घडल्याचे जाणवले असावे व तो रडवेल्या चेहेऱ्याने आपल्या आईला बिलगला. वर्षाची आता खरोखरीच अवघडल्यासारखी स्थिती झाली. तिला मोठ्याने रडावेसे वाटत होते, रडू येत होते परंतु लहानग्या ऋषीकडे पाहून तिने संयम ठेवला. उरलेली रात्र तिने व ऋषीने वरुणच्या मृतदेहाजवळ बसून काढली. सभरवाल अंकलनी वरुण व वर्षाच्या घरी, मुंबईला ही बातमी कळवली. सकाळ होताच वरुण गेल्याची बातमी सोसायटीत तसेच वरुणच्या ऑफिसातील सहकाऱ्यात वाऱ्यासारखी पसरली.

सकाळी वरुणच्या ऑफिसातील सहकारी सर्वप्रथम आले. सातच्या सुमारास पम्मी आली, रात्रीच्या वागण्याचा तिच्या चेहेऱ्यावर लवलेश दिसत नव्हता. तिने ऋषीला उचलून घेतले व बेडरूममध्ये नेऊन झोपवले. इकडे मुंबईहून चाबुकस्वार व देशमाने कुटुंबीयांनी मिळेल त्या विमानाने दिल्ली / चंडीगडकडे धाव घेतली. वरूणच्या कंपनीचे एम डी, रमाकांत सरदेसाई दिल्लीतच होते ते देखील बातमी समजताच आपला कार्यक्रम बदलून पंचकुलाकडे धावले.

दिवस जसजसा वर येऊ लागला तशी सोसायटीतील मंडळी जमा झाली. शेजारील तीनही फ्लॅट्सची दार सत्ताड उघडली व बसण्याची सोय करण्यात आली.

सुखविन्दरने तेथे जमलेल्या लोकांसाठी मिनरल वॉटर, चहा मागवला. “भाभीजी, हमे माराष्ट्रीयन तौर तरीके मालूम नाही, आप बतलाओगी तो हम कूच कर पायेंगे”, चक्रवर्तीने वर्षाला विचारले.

“नही, अभी मै कूछ भी सोच नही पा रही हू, मेरे और वरून के मम्मी पप्पा को आने दिजीये. ” वर्षा कडाडली.

एवढ्यात ब्रार साहेब आले, त्या नंतर एम डी साहेब आले तसा सुखविंदर सरसावला, “ सरजी, मै सुखविंदर, वरुणका पडोसी बरोटीवालामे मेरा फाब्रीकेशनका बिजनेस है. कल सवेरे लगभग इसी टाईमपर हम मिले थे, बिलकुल चंगा लग रहा था जी”. असे म्हणत ब्रार साहेबांचा ताबा त्याने घेतला.

साधारण अकराच्या सुमारास मुंबईहून मंडळी आली, त्यांनी एकंदरीत परिस्थितीचा आढावा घेतला व अंत्यसंस्कार पंचकुलामध्येच करण्याचा निर्णय घेतला. वरुण चाबुकस्वारांच्या घरात न भूतो न भविष्यती अशी गर्दी झाली. सुखविंदर ने ब्रार व सरदेसाई साहेबांना अखेर पर्यंत सोडले नाही. संध्याकाळी चारच्या सुमारास वरुणची अंतयात्रा निघाली, साधारणतः १०० मोटारींचा व अनेक मोटारसायकलींचा ताफा होता तो. वर्षा उद्वेगाने पाहत होती, तिने आईला सांगितले, ‘”मध्यरात्री जेव्हा मनुष्यबळाची खरोखरी आवश्यकता होती तेव्हा एकही हरीचा लाल आला नाही व आता देखावा करताहेत”.

तिला दादरच्या चाळीतले बालपणीचे दिवस आठवले. कशी मंडळी रात्री - बेरात्री एकत्र येऊन मदतीला धावायची. राण्यांची आजी आजारी झाली तर, आलटुन पालटून चाळकरी रात्रीचे राण्यांच्या घरी थांबत. त्याचवेळी तिने मुंबईला परतण्याचा महत्वाचा निर्णय घेतला व दुसऱ्या दिवशीच आपल्या व वरुणच्या आई वडिलांना सांगितला. “बाळ, गेले ते दिवस, आता सारं बदललंय”, “तरीही मी मुंबईला परतण्याचा निर्णयावर ठाम आहे. ” वर्षाचा निश्चय ऐकून सारेच गप्प झाले.......

३०. ०५. २०१६.

## आगळा वेगळा प्रयोग – अर्थात फसलेला

आमचे ‘गणंगपूर’ पश्चिम महाराष्ट्रातील सधन म्हणता येईल असे एक शहर. साधारणतः २ ते ३ लाख लोकसंख्येचं, सातारा -- फलटण रस्त्यावर. आमच्या गावाला – आताच्या शहराला बरं का – गणंगपूर हे नाव कसे पडले ह्याचा शोध घेण्यासाठी माननीय इतिहासाचार्यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती नेमली आहे. धाकले जयसिंगराव भोसले आमच्या शहराचे नगराध्यक्ष. त्यांच्या आजोबांपासून हे अध्यक्षपद त्यांच्याच घराण्यात आहे. त्यांचे आजोबा थोरले जयसिंगराव आमच्या गावचे ( तेव्हाच्या ग्रामपंचायतीचे) सरपंच, बोलायला खूप गोड, कधी कोणावर रागावणे नाही, खेकसणे नाही. त्यांचे विरोधक नेहमी त्यांचा उल्लेख आमच्या गावचे ‘महात्मा’ म्हणून करीत. असे असले तरीही त्यांच्या विरोधात उभे राहण्याचीही कोणाची हिम्मत नसे, जो विरोध करील, तो गावात पुन्हा दिसत नसे, अशा तऱ्हेने ते बिनविरोध निवडून येत. त्यांच्या नंतर त्यांचे चिरंजीव सोनसिंगरावानी गादी सांभाळली, धाकले जयसिंगराव सत्तेवर येईस्तोवर आमच्या गावाचे नगरात रुपांतर झालेले होते. अगदी थोरल्या जयसिंगरावां पासूनच राजकारणी, पत्रकार, विविध क्षेत्रातील प्रसिद्ध व वजनदार व्यक्तींची सरबराई करून त्यांना आपलेसे करून घेण्याची परंपरा भोसले घराण्यात अजूनही टिकून असल्यामुळे आमच्या शहराची तीन वेळा ‘आदर्श शहर’ म्हणून निवड झाली, त्यांच्या घराण्याच्या या परंपरेमुळेच त्यांची अनेक भली-बुरी ‘प्रकरणे’ दडपली

जात. धाकल्या जयसिंगरावांचा जनसेवेपेक्षा साम, दाम, दंड व भेद ह्या चौ सूत्रीवरच 'सत्ता' राबवता येते असा ठाम विश्वास असल्यामुळे कोणतीही गोष्ट, रिती - रिवाज, कायद्याने न करता manage करण्यावर भर असे. प्रत्येक निवडणुकीत आपल्या गणंगपूरची 'मुंबई' करू असे काहीसे अशक्यप्राय आश्वासन देत ही मंडळी निवडून येत.

आमच्या शहराचे वैशिष्ट्य म्हणजे येथील जनता पोलीस, कायदे - कानून, सरकार ह्यापैकी कोणालाच जुमानत नसे. जो तो स्वतःला कायद्यापेक्षा श्रेष्ठ समजत असे. एखाद्या व्यक्तीला जर का एखाद्या पोलिसाने अथवा सरकारी अधिकाऱ्याने पकडले तरीही तो थेट जयसिंगरावांच्या घरात फोन लाऊन आपली सोडवणूक करीत असे, त्यामुळे पोलिस कुणाला पकडण्याच्या फंदातच पडत नसत. आमच्या शहरात अनेक लहान मोठे रस्ते होते व गेल्या दोन पाच वर्षात सदर रस्त्यांवर अनेक ठिकाणी वाहतूक सुरळीत व्हावी म्हणून सिग्नल लावलेले होते. रस्त्यावर सिग्नल लागले, ते चालूही झाले, जो - तो सिग्नलचा लालदिवा पेटला तरी थांबणे हे कमीपणाचे समजू लागला व बिनदिक्कत वाहने हाकू लागला परिणामी अपघातांची संख्या वाढू लागली व जनतेत असंतोष वाढण्याची भीती छोट्या भोसल्यांना वाटू लागली. कदाचित आपले मतदार आपल्यावर रुसून इतर पक्षांकडे जातील ह्या भीतीने त्यांना पछाडले. शिक्षणात यथा तथा असलेले छोटे जयसिंगराव राजकारणात नाना फडणवीसाला देखील हरवतील असे. शहरातील जनता कितीही दांडगी असली तरीही अंधश्रद्ध होती. जयसिंगरावांच्या चाणाक्ष्य नजरेने एक गोष्ट टिपली की आपली माणसे जर एखादे काळे मांजर जरी आडवे गेले, तर असेल तेथेच थांबतात. हे हेरून, " आपण जर प्रत्येक

सिग्नलजवळ काळी मांजरे ठेवली व लाल दिवा लागताच त्यांना रस्त्यात सोडले तर? ” अर्थात, असले अचाट आचरट विचार केवळ जयसिंगरावाच्याच मेंदूत येऊ शकतात.

झाले, प्रत्येक गोष्टीत नगराध्यक्षाना झाडावर चढून स्वतःचे उखळ पांढरे करून घेण्याच्या सवयी नुसार जयसिंगरावांच्या भोवती नेहमी पिंगा घालणाऱ्या मंडळीनी “तर तर काय जबरदस्त आयडिया आहे ”, म्हणत लगेच स्थायी समितीच्या पुढील बैठकीच्या अजेंड्यावर सदर विषय आणला सुद्धा. “माझा ह्या प्रयोगाला विरोध  आहे”, अपेक्षे प्रमाणे विरोधी पक्ष नेते राकेश शिंदेनी ह्या योजनेला विरोध केलाच, त्यावर जयसिंगरावांचा उजवा हात असणाऱ्या सोपानराव जाधवांनी “ह्या सिग्नल प्रणालीचा अभ्यास करण्यासाठी एखाद्या त्रयस्थ संस्थेकडून ‘सर्व्हे’ करावा” असा प्रस्ताव मांडला, स्थायी समितीच्या अध्यक्षानी, “पुढील सभेत ह्यावर निर्णय घेऊ”, असे म्हणत असंतुष्टांना गाजर दाखवले.

“राकेश, तुझा भाचा ‘चंपक’ काय करतो रे? ” जयसिंगरावांनी शिंदेंच्या दुखरी नस चाचपली.

“त्याला एखादे काम मिळाल तर पहा”. राकेश शिंदे यांनी गळ घातली.

“ठीक आहे, उद्या चंपकला नगरपालिकेत येऊन फॉर्म भरायला सांग”, जयसिंगरावांनी सुचवलं. झालं, ‘सर्व्हेचे’ काम चंपकला  कायद्यातल्या साऱ्या तरतुदी पाळत, देण्यात आले.

मग काळी मांजर पुरवण्याचे कंत्राट एका नगर सेवकाला, प्रत्येक मांजरागणिक दररोज पाउण शेर दूध व चार उंदीर पुरवण्याचे कंत्राट देखील कायद्याच्या चौकटीत राहून विविध नगरसेवकांच्या गरजू नातेवाईकांना देण्यात आले. आता सारी मांजरे रस्त्यात राहणार म्हणून सिग्नलला खेटून त्यांच्यासाठी घरे ही हवीतच, त्या घरांचे डिझाईन एका प्रथितयश आर्किटेक्टकडून बनवून घेतले. तसेच घरे बनविण्याचे काम देखील नगराध्यक्ष्यांच्या एका नात्यातल्याला देण्यात आले.

सारे झाले, “आता मांजरी इथे तिथे पळू लागल्या तर”? रावराणेंनी शंका बोलून दाखवली. मग काय एक ‘ट्रेनर’ नेमला. मांजरी आजारी पडल्या तर, प्राण्यांचे डॉक्टर नेमले गेले, तसेच ह्या साऱ्यांचे रक्षण करण्यासाठी एक सुरक्षा दल देखील नेमले. रक्षकांना नेमताना ‘अर्थपूर्ण’ व्यवहार झाल्याचे कानावर आले ( थोडक्यात काय, तर दुष्टांना शहराचा विकास होताना पहावतच नाही, हेच खरे). ह्या सर्वांकरता लागणारा लाखो रुपयांचा निधी कसा उभारायचा हा लाख मोलाचा प्रश्न आता उपस्थित झाला. “ त्याचं असं आहे, सातारा व फलटण ह्या दोन्ही शहरांना जायला गणंगपुर मधूनच जावे लागते, फलटणच्या बाजारला दिवसभरात शेकडो मालमोटारी ये जा करीत असतात, तेव्हा आमच्या शहरातून जाणऱ्या मालमोटारींवर दोन – चार रुपये टोल लावावा”, असा लकडा जयसिंगरावांनी सरकार दरबारी लावला व आपले वजन वापरून सरकारकडून पाच रुपये प्रती वाहन, असा पुढील

सहा वर्षाकरिता टोल 'पास' करून घेतला व टोल वसुलीचे कंत्राट ही आपल्याच प्रभावळीतील एका होतकरू गरजवंताला (!!) साऱ्या अटींची पूर्तता करीत देऊन टाकले.

थोडक्यात काय, तर सुरुवातीला ठराविक मंडळीपुरती मर्यादित असणारी व भारतात पहिल्या प्रथमच राबवल्या जाणाऱ्या ह्या योजनेची चर्चा साऱ्या शहरभर पसरली व सर्वांना तिच्या बद्दल कमालीची उत्सुकता लागून राहिली. अखेर स्वातंत्र्य दिनापासून नवीन वाहतूक योजना जिल्ह्याच्या पालक मंत्र्यांच्या हस्ते कार्यान्वित करण्याचे ठरले. लगा लगा आवतन गेली. जागोजागी फ्लेक्स, होर्डिंग्ज लागली ज्यानुसार, मांजराचा बळी गेल्यास वाहन चालकाला नुकसानभरपाई म्हणून चक्क पंचाहत्तर हजार रुपये नगर परिषदेकडे जमा करावे लागणार होते. मांजरांचे ट्रेनिंग जोरात सुरु झाले. ट्रेनिंग करिता मांजराना शाळेच्या मैदानावर नेताना सारा रस्ता मोकळा होत असे.

काही दिवसात मांजरे कामात तरबेज झाली, लाल दिवा लागताच उंदीर दिसल्यावर ज्या चपळाईने मांजर त्यावर झडप घालते, तितक्याच सफलतेने मांजरे रस्त्याच्या मध्ये येऊन वाहतूक थांबवू लागली. उद्घाटनाच्या दिवशीतर काय विचारूच नका, सकाळी साऱ्या मांजराना न्हाऊ घातले, साऱ्यांची उघड्या वाहनातून शहरभर शोभा यात्रा काय काढली. राजकीय विश्लेषकांनी येत्या निवडणुकीत जयसिंगरावांनी आपली निशाणी काळं मांजर ठेवावे अशी मार्मिक प्रतिक्रिया दिली. पावसाळ्याचे दिवस असून सुद्धा पाऊस आज अजिबात फिरकलाच नाही. बराच गाजावाजा करण्यात आला, ह्या अभिनव योजनेचे श्रेय जयसिंगरवाना द्यायला मात्र कोणीही विसरले नाही. जिकडे तिकडे जयसिंगरावांचा उदोउदो चालू होता. जयसिंगरावांचे कान हे सारे ऐकून तृप्त झाले व त्यांना आपण काहीतरी

जगावेगळे केल्याचा साक्षात्कार झाला. अगदी धुमधडाक्यात नवीन योजनेचा शुभारंभ झाला. पालक मंत्र्यांनी लाल सिग्नलची कळ दाबताच दोन ‘काळीकंच’ मांजरे सिग्नलच्या एका पोल पासून रस्त्याच्या पलीकडे असणाऱ्या दुसऱ्या पोल पर्यंत शिस्तीने जाताच उपस्थितांनी जोरदार टाळ्या पिटून आपला आनंद व्यक्त केला, त्या व दुसऱ्या दिवशी स्थानिक वृत्तपत्रांनी रंगीत पुरवण्या काढल्या.

काही दिवस सारे कसे छान छान चालले असताना गणपतीच्या आधल्या दिवशी (चुकून बर का), एक मांजर सिग्नल तोडून जाणाऱ्या जयसिंगरावांच्या गाडीखाली आले. आता, आली का पंचाईत ! ( ह्या मांजराच्या गळयात दंडाची घंटा कोण बांधणार?) प्रकरण मिटवून जयसिंगराव घरी येत नाहीत तो मूक प्राण्यांवर प्रेम करणाऱ्या संघटने तर्फे मुंबईहून, “तुम्ही मुक्या प्राण्यांवर अत्याचार करीत आहात तेव्हा तुमच्यावर कायदेशीर कारवाई का करू नये? ” अशा आशयाची एक नोटीस आली.

तिला वकीलातर्फे उत्तर देण्यात दहा पंधरा दिवसाचा कालावधी लागला, त्यातच दुध पुरवणाऱ्या कंत्राटदाराने नासलेले दूध तर उंदीर पुरवणाऱ्याने सडके उंदीर पुरवायला सुरुवात केल्याचे लक्षात आले. कंत्राटदारांकडे त्याबाबत विचारणा करता “रक्षकांना त्याचं कट न मिळाल्यामुळे ते हे असले आरोप करतात”. असा पवित्रा त्यांनी घेतला. पुढील धोका लक्षात येताच दररोज रात्री मांजराना शिकारीकरिता सुटे सोडण्याचा ठराव झाला, रात्रीच्यावेळी मांजरांनी रस्त्याच्या आजूबाजूच्या घरांत धुमाकूळ घालायला सुरुवात केली.

जनतेला देखील सुरुवातीला गम्मत वाटली परंतु नंतर कुरबुरी सुरु झाल्या. दिवाळीत तर एवढी गर्दी झाली, व वाहतुकीची अभूतपूर्व कोंडी झाली की सारी वाहतूक यंत्रणाच कोलमडून पडली व जो तो आपापली वाहने पुढे रेटू लागला. ह्या गोंधळात नक्की कोणाच्या वाहनाखाली (काही कळेना! पण) काही मांजरांचे प्राण गेले! प्रकरण नुकसान भरपाईला पोहोचले व तिकडे वादाला तोंड फुटले, आरोप प्रत्यारोप होऊ लागले. आधीच प्राणीमित्रांच्या प्रश्नांना उत्तरे देताना मेटाकुटीला आलेले धाकले जयसिंगराव चांगलेच कावले.

तेवढ्यात मुंबईच्या एका खाजगी वाहिनीला हा विषय कुणा 'असंतुष्टानी' पुरवला मग तर काय रात्री ९च्या स्लॉट मध्ये ह्या विषयावर जोरदार चर्चा सुरु झाल्या. शेवटी सरकारने ह्या ' मांजर वाहतूक नियंत्रण ' योजनेला स्थगिती देत त्याअंतर्गत झालेल्या व्यवहारांची सर्वांगीण चौकशी करण्यासाठी एक समिती नेमली व तिला अहवाल एका वर्षात द्यायला सांगितले. अशा तऱ्हेने मांजराद्वारे वाहतुकीचे नियमन करण्याची अभूतपूर्व योजना सहा महिने देखील टिकली नाही परंतु पुढील सहा वर्षे टोल मात्र सगळ्या मालमोटार चालकांच्या बोकांडी बसला त्याकडे कोणाचेच लक्ष गेले नाही.

१४. १२. २०१४

जीवनगौरव

आज सकाळ पासून श्री स्वयंभूलिंगम परमेश्वरन, सिनिअर मॅनेजर एच आर, खिंवसारा समूह ( F. M. C. G. मधील एक दादा कंपनी) खूपच खुषीत होते त्याला कारणही तसेच होते. आज समूहाचे संस्थापक श्री. गेंदामल खिंवसारा यांच्या हस्ते, त्यांना कंपनीच्या इतिहासात पहिला वाहिला 'जीवनगौरव' पुरस्कार दिला जाणार होता. गेली अनेक वर्षे दसऱ्याच्या आधल्या दिवशी लॉंग सर्व्हिस अवार्ड देण्याचा उपचार परमेश्वरन इमाने इतबारे करीत आलेले होते, त्यासाठी तीन ते चार महिने तयारी करीत असत. सकाळपासूनच सारे आपली यंत्र, शॉपफ्लोअर, ऑफिस, टेबल्स, वगैरे सजवण्यात गढून गेलेले होते. हरएक विभागातील पूजा आटोपत गेंदामलशेट साडेतीनच्या सुमारास स्वतःच्या ऑफिसात आले. आज जवळ जवळ प्रत्येक विभागानी पुजेचा मान परमेश्वरन साहेबाना दिला व गेंदामलांनी सुद्धा मनाचा मोठेपणा दाखवत दुय्यम भूमिका स्वीकारली. उपस्थितांचे स्वागत, सांस्कृतिक कार्यक्रम, सत्कार मूर्ती संदर्भात संस्थापकांचे भाषण, सर्व्हिस अवार्ड व संध्याकाळी संस्थापकासमवेत भोजन असा कार्यक्रम होता.

साधारणतः दहाच्या सुमारास एस पींच्या पत्नी, नागरत्नम्मा व मुलगी रेवती ऑफिसात पोहोचल्या. कार्यक्रम सुरु झाला. वास्तविक परमेश्वरन उर्फ एस पी ना ओळखत

नाही असा माणूस संपूर्ण खिंवसारा समुहामध्ये शोधून सापडणार नाही. एस पी ची मातृभाषा तामीळ परंतु त्याना हिंदी, उर्दू, तेलगू ह्या भाषा अवगत होत्या, पुढे ते इंग्रजी देखील शिकले व समूहाचा व्यवहार पाहू लागले. गेंदामल बोलायला उभे राहिले, ते आपल्या अत्यंत विश्वासू सेवकाबद्दल, काय बोलतात ह्याकडे सगळयांचे कान लागले होते. ते बोलू लागले व सुरुवातीच्या ५ – ७ वाक्यानंतर परमेश्वरन यांच्या समोर त्यांचा भूतकाळ एखाद्या चित्रपटा प्रमाणे दिसू लागला.

खिंवसारा समुहाची मुहूर्तमेढ साधारणत: १९८५ च्या सुमारास गेंदामल यांनी आंध्रप्रदेशातील मेडक जिल्ह्यात बोलारम जवळ रोवली, तेव्हा नोकरीच्या शोधात असणारा एक तरुण हैदराबादच्या बस मध्ये गेंदामलना भेटला. द्याल तो पगार व म्हणाल तिकडे जाण्याची - राहण्याची तयारी असणारा हा गेंदामलना नावडता तरच नवल. त्यांनी त्याला पदरी ठेऊन घेतले. सुरुवातीला पडेल ते काम करत एस पी गेंदामल यांच्या सोबत हिंडू लागला. पुढे हळू हळू जसजसा समुहाचा पसारा वाढू लागला तसे सुरुवातीला जिल्हाधिकारी व नंतर हैद्राबादला जाऊन परवानग्या मिळवणे वगैरे कामे तो करू लागला. सुरुवातीला लोणची, मसाले बनवणारी इंडस्ट्री आता मिनरल water, instant मिक्स, चिप्स सारखी उत्पादने विकू लागली व तेव्हा तिचे रुपांतर खरेच एका मोठ्या इंडस्ट्रीत झाले. तिचा मार्केट शेअर १५% पर्यंत वाढला. ऑफिस साठी बेगमपेट येथे जागा मिळवण्यात एस पी चा सिंहाचा वाटा होता.

एकदा एक फूड व ड्रग खात्याचा अधिकारी चांगलाच नडला होता. एस पी ने रातो रात जाऊन त्याला पटवले होते व मालकाची शाबासकी मिळवली होती. दर वर्षी

दसऱ्याच्या अलीकडे बोनसचे वाटप होत असे. त्या काळी खिंवसारा समुहामध्ये 'कम्युनिस्टांची' एकच कामगार संघटना होती व तिचे नेतृत्व प्रसिध्द कामगार नेते सुशांत रे यांच्याकडे होते. १९९३च्या दसऱ्याच्या सुमारास तिने १५% बोनस व ८०० रु. सानुग्रह अनुदान दिले जावे अशी मागणी केली. गेंदामलशेटनी ही मागणी तत्वतः मान्य केली, आणि एस पी कामाला लागले, 'हेलो, मी एस पी बोलतोय, रामा राव आहेत काय? " (रामा राव म्हणजे, कामगार संघटनेतील असंतुष्ट गटाचा म्होरक्या), "रामा माझे तुमच्याकडे छोटेसे काम आहे. " मग रात्रभर भेटीगाठींचे सत्र चालले, अवजड पेट्यांची देवाण घेवाण झाली. एके दिवशी सकाळीच स्थानिक कामगार संघटनेचा नेता सोमेश्वर रेड्डी याच्या 'भूमिसेने'तर्फे एक मोर्चा आला व इतकी वर्ष कामगारांचा विश्वास संपादन करणारी संघटना अल्पमतात असल्याचा दावा करण्यात आला. वातावरण भलतेच तंग झाले होते, दोनीही संघटना एकमेकांसमोर शड्डू ठोकून उभ्या राहिल्या. महिनाभर बरीच तणातणी झाली व व्यवस्थापनाला काही दिवस कारखाना बंद करण्याचा निर्णय घ्यावा लागला. ह्या सगळयात बोनसचा विषय मागे पडला, व ते वर्ष बोनस विनाच गेले.

एका रात्री रामा रावचे व एस पींचे संभाषण चालू होते, "रामा, शेटजी चांगलेच कोंडीत अडकलेले आहेत, एवढेच नव्हे तर कारखाना महाराष्ट्रात हलवायच्या विचारात आहेत", झाले रामा रावने बाहेर जाऊन शेटजी व्यवसाय बंद करणार असल्याची वावडी उठवली. दोनीही युनियननी माघार घेत कारखाना सुरु व्हावा म्हणून आर्जव केले. कारखाना सुरु झाल्यावर व्यवस्थापनाने येत्या २० दिवसांत दोनीही युनिअनच्या दाव्यावर

मतदान घेण्याचे ठरवले. रेड्डीने २०% बोनस व १००० रु अनुदान, रोज एक तास लंच टाईम वगैरे मिळवून देण्याचे आमिष दाखवले. मतदानाच्या दिवशी जुन्या कामगारांना ‘महत्वाच्या कामासाठी’ हैद्राबादला पाठवण्यात आले, तर नव्या भूमी सेनेला विरोध करतील असे वाटणाऱ्या व्यक्ती मतदान केंद्राकडे फिरकणार नाही याची ‘लोकशाही पद्धतीने’ खबरदारी घेण्यात आली. साम, दाम, दंड, भेद सार काही वापरण्यात आले. अखेर कम्युनिस्ट संघटनेने माघार घेतली व स्थानिक ‘भूमी सेने’चे प्रतिनिधी खिंवसारा समूहामध्ये कम्युनिस्टांच्या जोडीला वाटाघाटी करण्यास सिद्ध झाले. ह्या साऱ्या खेळात एस पी ची भूमिका किती महत्वाची होती, पुढील काळात नव्या युनियनने व्यवस्थापनाला कसे सहकार्य करायचे हे केवळ एस पी व गेंदामल शेटनाच ठाऊक होते व ते आजवर गुलदस्त्यातच राहिले.

टाळयांच्या कडकडाटाने एस पी भानावर आले, पाहतात तो शेटजी आपले भाषण संपवून जागेवर परतत होते. नकळत ते उभे राहिले व वाकून शेटजीना व प्रेक्षकांना अभिवादन केले. कार्यक्रमाच्या सूत्रधाराने एस पी ना आपल्या आठवणी, आपले मनोगत व्यक्त करण्याची विनंती केली.

एस पी बोलायला उभे राहिले. “ मित्रानो, ” सहकाऱ्यांकडे दृष्टीक्षेप टाकत एस पी बोलू लागले, “ आज माझ्या मनात आठवणींनी एवढी गर्दी केलेली आहे की कोणती सांगू आणि किती सांगू ह्या बाबत माझा गोंधळ उडालेला आहे, तरीही, १९९३ साली खिंवसारा इंडस्ट्रीमध्ये झालेल्या भूमिसेनेच्या प्रवेश काळाची एक आठवण मी आपल्या

सोबत शेअर करू  इच्छितो. ” असे म्हणून एस पी नी एक मोठा पॉझ घेतला, शेटजीं कडे पहिले, ते आपले शांत होते. काहीतरी नवीन व सनसनाटी ऐकायला मिळणार म्हणून सहकाऱ्यांच्या चेहेऱ्यावर उत्सुकता दिसू लागली, अर्थात पहिल्या एक दोन ओळींच्या पुढे श्रोत्यांचे चेहेरे अस्पष्ट दिसत व पुढे नुसतीच गर्दी दिसत होती. “त्याचे असे झाले”, कारखान्यात झालेल्या पहिल्या वहिल्या टाळेबंदीच्या विषयावर एस पी बोलू लागले. “आपल्या स्थापनेपासून आपल्या सोबत असणाऱ्या संघटनेने अचानक १५ % बोनस व रु १००० अनुदान मागितले व त्याच संध्याकाळी भूमी सेनेचे रेड्डी मला येऊन भेटले व त्यांनी तत्कालीन कम्युनिस्ट युनियनच्या कामाला कामगार कसे कंटाळलेले आहेत याचा पाढा वाचला. मी शेटजींच्या कानावर ही बाब त्वरित घातली, त्यांनी नव्या युनियनच्या प्रवेशाला कडाडून विरोध केला व मी नेहमी प्रमाणे माझ्या कामगारांच्या बाजूने उभा राहीन असे सांगितले व फोन बंद केला. त्यानंतर रेड्डी परत गेले. नंतर काहीच समजले नाही आम्हाला वाटले सारे शांत झाले, परंतु एके दिवशी अचानक कामगारांचा एक मोर्चा चालून आला. व्यवस्थापनाने संघर्ष टाळण्याचा सर्वतोपरी प्रयत्न केला. परंतु, देवाच्या मनात काही वेगळेच होते. अखेर केवळ कामगारांचे हित डोळयासमोर ठेऊन, त्यांच्यावर बेकारीची कुऱ्हाड कोसळू नये म्हणून व्यवस्थापनाला भूमिसेनेच्या प्रवेशाचा कटू निर्णय स्वीकारावा लागला. ज्या दिवशी मतदाना द्वारे हे सारे घडले तो संपूर्ण दिवस शेटजी किती अस्वस्थ होते याचा मी साक्षीदार आहे. ”

शेटजींच्या चेहेऱ्यावर समाधान दिसत होते. शेटजीनी टाळया वाजवताच साऱ्यांनी टाळयांचा कडकडाट केला. एस पी ना आणखी एक किस्सा सांगावासा वाटला. “पाच वर्षापूर्वी रामप्पा रावच्या ( एक्साईझ विभागातील सहाय्यक) वडिलांना संध्याकाळी हृदयविकाराचा झटका आला, हॉस्पिटल मध्ये दाखल करून लाइफ सेव्हिंग इंजेक्शन देण्याची वेळ आली, शेटजीनी रावच्या वडिलांच्या औषधपाण्याचा सारा आर्थिक भार उचलला”. स्टेज वरून टाळी वाजताच संपूर्ण सभागृह टाळयांच्या काडकडाटात बुडाले. एस पी आता थांबत नाही असे वाटू लागले इतक्यात एस पी ने शेटजींकडे पहिले, ते कपाळावरील घाम पुसत होते. “आणखी बऱ्याच आठवणी आहेत परंतु वेळेअभावी मी माझे भाषण आवरते घेतो. शेटजी माझ्या आयुष्यात देवासारखे आले, त्यांनी मला संधी दिली, माझ्यावर अगदी मुलाप्रमाणे माया केली, तेव्हा मी त्यांचा आभारी आहे व पुढील आयुष्यात त्यांना हवी ती मदत करण्यास हा शिपाई आनंदाने उभा असेल ह्याची मी खात्री देतो व माझे भाषण संपवतो”.

टाळयांच्या कडकडाटात एस पी नी भाषण संपवले. शेटजींनी एस पीं चा शाल, श्री फळ व चांदीचे तबक देऊन सत्कार केला, मानपत्र वाचून दाखवले. मानपत्राची फ्रेम स्वीकारताना मात्र एस पी काहीसे गहिवरले. कार्यक्रमानंतरच्या भोजन समारंभात एस पी काहीसे गप्पगप्पच होते. दिवाळी नोव्हेंबरच्या पहिल्या आठवड्यात होती म्हणजे दिवाळीत एस पी खिंवसारा समुहात नसणार. ३१ ऑक्टोबरला स्वयंभूलिंगम परमेश्वरन निवृत्त झाले. दिवाळीच्या दिवशी सकाळीच ते शेटजींच्या बंगल्यावर आपल्या मुलीसह

(रेवतीसह) गेले, बंगल्यावर तशी वर्दळ कमीच होती. भाभिजीनी (शेटजींच्या पत्नी ने) विचारपूस केली. शेटजी आपल्या नातवां सोबत दिवाणखान्यात आले. शेटजींचे एस पींच्या कडे लक्षच नव्हते. एस पी उठून उभे राहिले, दिवाळीच्या शुभेछ्या दिल्या, शेटजींनी शुभेछ्यांचा स्वीकार केला व ते नातवंडा मध्ये पुन्हा रमले, नेहमी पेक्षा आज वेगळा अनुभव आला व एस पीं च्या मनात चर्र झाले.

साधारण ९० – ९१ साली फ़ॅक्टरी मॅनेजरांचे शेटजींबरोबर काही मतभेद झाले. त्यानंतर झालेल्या मीटिंग मध्ये शेटजींनी सारी सूत्रे स्वतः कडे ठेवत मॅनेजरना नोकरी सोडून जावे लागले. दुखावलेले एस पी घरी परतले दोनच दिवसांनी ड्रायव्हर गाडी चालू होत नाही म्हणून सांगू लागला, योगायोग पहा त्याच वेळी ऑफिसातून एस पी ना ऑफिसात नेणारा ड्रायव्हर व एक जुनिअर ऑफिसर गाडी गराज मध्ये नेतो सांगून 'टो' करून घेऊन गेले.

९२ साली एक डायरेक्टर श्री राजा प्रकृती ठीक नसल्याने निवृत्त झाले, वास्तविक डायरेक्टर्सना तहहयात मोटार देण्याची प्रथा आहे. परंतु, दोनच दिवसांनी परमेश्वरना वरून निरोप आला राजांची गाडी परत आणा. एस पी सकाळीच राजांच्या घरी गेले व विदेशी पाहुण्यांच्या स्वागतासाठी गाडी हवी, असे कारण देत त्यांची गाडी घेऊन आले. एस पींच्या डोळयासमोर तो प्रसंग उभा राहिला.

आणखी एक आठवण एस पी ना अस्वस्थ करून गेली. त्याचे असे झाले. ९० – ९२ च्या सुमारास खिंवसारा समूह आर्थिक संकटात सापडला, बँका कर्ज देईनाश्या झाल्या, मार्केटमध्ये समूहाच्या ‘क्रेडीबिलीटी’चा प्रश्न निर्माण झाला. एवढ्यात, म्हैसूरच्या कामथ ग्रुपचे ‘फायनान्स’ सांभाळणारे मुथैय्या काही कामानिमित्त बेगमपेट ला आले होते व तेथे ते काही दिवस रहाणार होते. मुथैय्या मुळचे विजयवाड्याचे, एस पी ने एका संध्याकाळी त्याना गाठले, तिसऱ्या – चौथ्या भेटीतच तो गृहस्थ खिंवसारा समुहात त्याना, ‘संपूर्ण निर्णय स्वातंत्र्य असेल’, ह्या आश्वासनावर यायला तयार झाला. लवकरच त्यानी फायनान्सची सारी सूत्रे हातात घेतली. महिन्याभरातच समूहाची कार्यपद्धती समजून घेतली, स्वतःच्या विश्वासातील माणसे आणली. सर्वप्रथम वेगवेगळी ‘लूप होल्स’ बुजवायला सुरुवात केली. दर रविवारी शेटजींच्या बंगल्यावर मुथैय्या आठवडाभरात झालेल्या घडामोडींचे ब्रीफिंग करू लागले.

जसजसे मुथैय्या शेटजींच्या जवळ जाऊ लागले तसतसे प्रस्थापितांचे B. P. वाढू लागले. एकदिवस कुजबुज आघाडीवर, समूहाचे लोन व लोन चे restructuring करताना बराच मोठा घोटाळा झालेला आहे व त्यांत समूहाचा मोठा तोटा झालेला आहे व त्यांत भावी सी. एफ. ओ. असे गौरवलेले, डी राजीवन गुंतले असल्याची चर्चा सुरु झाली. राजीवन यांच्या प्रभावळीतील मंडळी चांगलीच धास्तावली. दोन - तीन वर्षात समूहाच्या अर्थव्यवस्थेची गाडी रुळावर आली. मुथैय्यानी नवीन बँकांकडून कर्ज उभारायला सुरुवात

केली. शेटजींनी मुथैय्या चे गुणगान गायला सुरुवात केली व इकडे प्रस्थापितांचा पोटशूळ उठू लागला.

जानेवारीच्या सुमारास शेटजींना आपल्या फ़ॅक्टरीच्या बाजूचा मोकळा प्लॉट खुणावू लागला. परंतु, मुथैय्यानी गुंतवणुकीला स्पष्ट नकार दिला, त्याची कारणमीमांसा करताना ते म्हणाले, “कोणतीही स्थावर मालमत्ता खरेदी करावयाची असल्यास, अंदाजपत्रकीय बैठकीत ती वर चर्चा होणे आवश्यक असते, म्हणजे सदर समिती त्या करिता लागणाऱ्या गंगाजळीची व्यवस्था करते, येथे तसे काहीच झालेले नाही, तेव्हा आपण हा विषय पुढे ढकलू”. नकाराची सवय नसणाऱ्या गेन्दामलना हे सहन होणे शक्यच नव्हते तरीही ते गप्प राहिले. त्या नंतर दहा – पंधरा दिवसांनंतर एका सकाळी मुथैय्यांच्या बंगल्यावर अचानक शेटजी सहज म्हणून गेले, पाहतात तर समूहाला पतपुरवठा करणाऱ्या बॅंकेचा जनरल मॅनेजर मुथैय्यांसोबत काही कागदपत्रे पाहत होता. शेटजीना अचानक पाहताच दोघांनी विषय आवरता घेतला व जी एम साहेबानी तेथून काढता पाय घेतला.

ह्या घटने नंतर चारच दिवसांत फिनान्सचे व्ही पी सांगत आले, “विविध सरकारी विभागांना, अधिकाऱ्यांना देण्यात येणारी फास्ट मनीची रक्कम मिळण्यात आजकाल बऱ्याच अडचणी येतात, व ती रक्कम कोठे खर्च केली ह्याचा तपशील देखील द्यावा लागतो, जो आजतागायत कधीच दिला जात नसे”.

आणखी काही दिवसांनी तर मुथैय्यांवर एक लाख शेअर्स एका त्रासदायक गुंतवणूकदाराला विकल्याचा आरोप झाला व काही समजण्या आधीच मुथैय्या खिंवसारा समूह सोडून गेल्याची व डी राजीवन यांची पदोन्नती झाल्याची बातमी आली.

आज सकाळीच एस पी खिंवसारा समूहाच्या मुख्यालयात फुल आणि फायनल सेटलमेंट करण्यासाठी गेले. कधी नव्हे ती आज त्यांची मुलगी रेवती सोबत आली होती. एरवी एस पीना पाहून सलाम करणाऱ्या सिक्युरिटीने त्यांची गाडी गेटच्या बाहेर असणाऱ्या व्हिजिटर पार्किंग मध्ये लावण्याची सूचना केली आणि एस पींच्या मनात शंकेची पाल चुकचुकली. रीसेप्शनीस्टने ते आल्याची वर्दी एच आर विभागात दिली. दुपार होऊ लागली तरीही एस पीं ची दाखल घ्यायला कोणीही आले नाही की त्यांना कोणी चहा देखील विचारला नाही. नोकरीत असताना एस पींच्या आजूबाजूला घुटमळणारी मंडळी त्यांची नजर चुकवताना पाहून एस पी ना चांगलाच धक्का बसला. रेवतीने आपल्या वडिलांच्या डोळ्यातील असहायता टिपली व दोनदा रिसेप्शनिस्टला जाऊन आणखी किती वेळ थांबावे लागेल असे विचारून आली. तिने शांतपणे उत्तर दिले, “ साहेब बिझी आहेत, फ्री झाले की बोलावतील”.

अखेर तिचा ही संयम संपला व ती एस पीना घेऊन घरी जाण्या साठी उठली. ती दोघे समूहाच्या मुख्य दरवाज्याशी पोहोचत नाहीत तो त्यांना पुन्हा परत रिसेप्शन मध्ये यावे असा निरोप मिळाला. तेथे येऊन पाहतात तो काय, एक जुनिअर ऑफिसर उभा होता. एस पीनी आपली ग्रॅच्यूइटी, दोन वर्षाचा एल टी ए, लिव्ह एनकॅश्मेंट, पी एल बी ची जी रक्कम मनात धरून आणलेली होती तिच्या पेक्षा त्या नवशिक्या एच आर ऑफिसरने

आणलेल्या चेकची रक्कम चक्क दीड लाखांनी कमी होती. बर, पुढील आठवड्यात अन्नमंत्र्यांची सदिच्छा भेट असल्या कारणाने कोणीही अधिकारी पुढील दहा ते बारा दिवस भेटू शकणार नव्हता.

घरी येताच रेवतीने एस पी वर न भूतो न भविष्यांती असे तोंड सोडले. “आणि म्हणे, तू आमच्या समूहाला का जॉईन होत नाहीस? ” “कशा करता? ” ‘माझ्या आयुष्याचा सर्वोत्तम काळ जर मी एक कंपनी साठी / समूहासाठी देणार असेल तर माझ्या कष्टांची कदर करणे हे त्या समूहाचे कर्तव्य ठरते. गरज संपल्यावर ते कसे काय मला वाऱ्यावर सोडू शकतात? ” “आपा, तुमच्या काळची गोष्ट निराळी होती, परंतु तुमच्या सारखी माणसे जर शेटजींच्या पाठीशी उभी राहिली नसती तर ह्या समूहाने एवढे रूप धारण केले असते काय? ” एस पी विचार करू लागले, आपले खरेच कोठे चुकले? इतरांनी त्यांच्या महत्वाकांक्षा पूर्ण करण्यासाठी मला वापरले, त्या गडबडीत माझे आयुष्य मी जगलोच नाही.



हरकत नाही, ह्या पुढचे आयुष्य मी माझ्या कुटुंबासाठी देणार असा निश्चय करून एस पी पुन्हा कामाला लागले.

# ई साहित्य प्रतिष्ठान

मित्रहो , सहजासहजी फ़ुकट काहीच मिळत नाही. न आरोग्य न धन न संपदा. काहीही मिळवायचं तर संघर्ष आणि श्रम करावेच लागतात. “गोलमाल” करून, मेकओव्हर सर्व काही मिळवता येतं असा गैरसमज माध्यमांद्वारे सर्वत्र पसरवला जात आहे. झटपट श्रीमंती, आठ दिवसांत गोरेपणा, महिन्याभरात लांबसडक केस, एक हनुमान यंत्र गळयात बाधले की आजारांपासून मुक्ती अशा जाहिराती माथी मारल्या जात आहेत. अशा वेळी अर्थपूर्ण पुस्तकं वाचून माणूस “जमिनीवर” येतो.  फ़ुकट काहीच मिळत नसतं. प्रत्येक गोष्टीसाठी कुणाला न कुणाला कष्ट पडतात. कधी आपल्याला, कधी आपल्या आईवडलांना, गुरूंना, तर कधी समाजातील इतरांना.

ई साहित्य प्रतिष्ठानची पुस्तकं विनामूल्य मिळतात. पण ती लिहिण्यासाठी लेखकांचे कष्ट व बुद्धी लागलेले असतात. आणि या एकेका पुस्तकाची किंमत म्हणुन लेखक हजारो लाखो रुपये मिळवू शकतात. पण मराठी वाचकांना  विनामूल्य पुस्तकं मिळावी, व मराठीत वाचन संस्कृती वाढावी म्हणून असंख्य लोक प्रयत्न करीत आहेत. या प्रयत्नांत ई साहित्य प्रतिष्ठान व हे सर्व लेखक सहभागी आहेत. आपण या अभियानात सहभागी झालात का?

आपण ई साहित्य प्रतिष्ठानचे VIP सभासद झालात का?

VIP सभासद बनणं अगदी सोप्पं आहे.

आपल्या ओळखीच्या दहा मराठी लोकांचे मेल आय डी कळवा आणि बना VIP सभासद.

एका दमात तीन कामं.

1. पहिलं म्हणजे तुम्ही VIP सभासद बनता. तुम्हाला ई साहित्य प्रतिष्ठानचं पुस्तक ई मेलवर सर्वात आधी मिळतं. त्यांच्या कार्यक्रमाचं आमंत्रण मिळतं. त्यांच्या योजनांची माहिती मिळते. त्यांच्या कामात स्वतः सहभागी होण्याची संधी मिळते.

2. ज्या दहा किंवा अधिक मित्रांना तुमच्यामुळे फ़्री पुस्तकं मिळतात ते खुश होतात. त्यांना त्यांच्या आवडीची पुस्तकं मिळाली की ते इतर लोकांना तुमच्याबद्दल सांगतात. त्यांच्यासाठी तुम्ही म्हणजेच ई साहित्यचे प्रतिनिधी बनता.

3. यातून तुम्ही मराठी भाषेच्या संवर्धनाला अमूल्य असा हातभार लावता. आमचा उद्देश आहे मराठीतल्या सहा कोटी साक्षरांना वाचक बनवणं. आणि हे लक्ष्य साध्य करणं हे केवळ आणि केवळ मराठी लोकांना त्यांच्या भाषेवर असलेल्या प्रेमातूनच शक्य आहे. आपल्या भाषेचं राज्य व्हावं म्हणून १०६ हुतात्मे झाले. आपल्या भाषेनं राजा व्हावं म्हणून आपण एक दहा-वीस ई मेल आयडी देणारच ना! वाचनाची आवड असो वा नसो. फ़क्त मराठी साक्षर अशा दहा लोकांचे ई मेल पत्ते पाठवा. त्यांना वाचनाची आवड आपोआप लागेल. आपणच लावू. लावूच लावू. करूनच दाखवू.

आहे ना : एक दम : तीन कामं.

संपर्क साधा : esahity@gmail.com

ही सेवा पूर्णपणे निःशुल्क आहे. त्यामुळे आपले मित्र आपल्यावर खुश होतील. शिवाय आम्ही ही खात्री देतो की या ई मेल्सचा वापर फ़क्त आणि फ़क्त मराठी साहित्य पाठवण्यासाठीच केला जाईल. इतर कसल्याही जाहिराती पाठवून त्यांना त्रास दिला जाणार नाही. तेव्हा लवकरात लवकर आपल्या माहितीतल्या दहा किंवा अधिक मराठी साक्षरांचे ई मेल पत्ते आम्हाला द्या.

अधिक माहितीसाठी, आम्ही कोण ते जाणून घेण्यासाठी एकदातरी www.esahity.com या वेबसाईटला भेट द्या.

आपल्या पत्राची वाट पहात आहोत.

धन्यवाद

आपले नम्र

टीम ई साहित्य प्रतिष्ठान

